जळगांव जिल्ह्यातील प्र.जि.मा.क्र.४९ नकाशात
दुरुस्त करुन दाखविणे बाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक बांधकाम विभाग
शासन निर्णय क्रमांक :- रवियो-२०१४/प्र.क्र.२३/नियोजन-२
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- १५ जून, २०१५.

पहावे :- १) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, जळगांव यांचे पत्र क्र.साबामंज/ रेशा/प्रआ/२०६२/सन २०१४, दिनांक ११/४/२०१४.

२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचे पत्र क्र.का-५ साबांप्राविना/रवियो-२००१-२१/पारोळा/प्रजिमा-४९/प्रआ/५७५३/ २०१४, दिनांक ४/१०/२०१४.

३) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, जळगांव यांचे पत्र क्र. साबामंज/ रेशा/प्रआ/१३१८/सन २०१४, दिनांक २०/३/२०१५.

प्रस्तावना :-

अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, जळगांव व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांनी संदर्भाधिन पत्रान्वये जळगांव जिल्ह्यातील पारोळा तालुक्यातील प्र.जि.मा.क्र.४९ दुरुस्त करुन दर्शविण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. विषयांकीत प्र.जि.मा.क्र.४९ हा रस्ता, रस्ते विकास योजना २००१-२१ नुसार बोळे, मोढाळे, बहादरपूर, फापोरा बु., अमळनेर, धार, मारवड, कळमसरे, निंब ते जिल्हा हद्द असा असून, त्याची लांबी ५८/३०० कि.मी. आहे. सदर रस्ता जिल्हा रस्ते सूचीमध्ये याप्रमाणेच दर्शविण्यात आला आहे. मात्र पारोळा तालुका व जळगांव जिल्हाच्या नकाशामध्ये सदर रस्त्याची बोळे ते रा.म.मा.क्र.६ पर्यंत दर्जोन्नत झालेली लांबी अनावधानाने दर्शविण्यात आलेली नाही.

तसेच रस्ते विकास योजना २००१-२१ नुसार रत्नपिंप्री-कंकराज-शेवगे बु.-पुनगांव-करंजी हा इ.जि.मा. क्र.७४ असा असून त्याची लांबी २२/५०० कि.मी. आहे. करंजीपासून पुढे करंजी-मुदाणे-शेवगे- बोळे ते रा.मा.क्र.१५ पर्यंतचा (रस्ते विकास योजना १९८१-०१ नुसार प्र.जि.मा.५१, ८/५०० कि.मी.) रस्ता दर्जावनत करुन इ.जि.मा. ७४ मध्ये समाविष्ट करावयाचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय :-

मुख्य अभियंता, बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, जळगांव यांचा प्रस्ताव विचारात घेऊन, पारोळा तालुक्यातील प्र.जि.मा.क्र.४९ रस्ते सूचीनुसार जिल्हा व तालुका नकाशामध्ये दर्शविण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच रत्नपिंप्री-कंकराज-शेवगे बु.-पुनगांव-करंजी हा इ.जि.मा. क्र.७४ पुढे रा.म.मा.क्र.६ ते मुंदाणे ते बोळे तांडा पर्यंत

वाढविण्यात येत आहे. त्यामुळे इ.जि.मा.क्र.७४ चे नांव रत्नपिंप्री-कंकराज-शेवगे बु.-पुनगांव-करंजी-मुंदाणे-शेवगे-बोळे तांडा असे होईल. त्यामुळे इ.जि.मा.क्र.७४ ची लांबी २२/५०० + ८/५०० = ३१/००० कि.मी. होईल. परिणामी जिल्ह्याच्या एकूण इ.जि.मा. च्या लांबीत ८/५०० कि.मी. ची वाढ करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६१५१२३६३०५५१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjeev Anant Rane

Digitally signed by Sanjeev Anant Rane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjeev Anant Rane
Date: 2015.06.15 12:38:14 +05'30'

**( संजीव राणे )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व जिल्हा /तालुका नकाशामध्ये बदल करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

२) मुख्य अभियंता, (मग्रारविसं), मंत्रालय, मुंबई.

३) विभागीय आयुक्त, नाशिक.

४) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, जळगांव (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व जिल्हा / तालुका नकाशामध्ये बदल करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)

५) जिल्हाधिकारी, जळगांव.

६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जळगांव.

७) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अमळनेर.

८) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.

९) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.

१०) निवडनस्ती.